राज्यातील नव्याने स्थापन करण्यात आलेल्या नगरपरिषदा/ नगरपंचायती या नागरी स्थानिक संस्थातील पदांच्या आकृतीबंधास मान्यता मिळण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमसीओ-२०२३/प्र.क्र.३८९/नवि-१४**

मुख्य इमारत, ४ था मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ०३२
दि. २६ ऑगस्ट,२०२४.

**संदर्भ:**-१.नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.०५.०७.२०१६.
२.नगर विकास विभाग,शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१६/प्र.क्र.३०१/भाग-१/नवि-१४, दि.२२.०९.२०१७.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१८/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.१२.०२.२०१८.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१९/प्र.क्र.७४/नवि-१४, दि.१७.०६.२०१९.
५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१९/प्र.क्र.६९/नवि-१४, दि.११.०९.२०१९.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२१/प्र.क्र.१५५/नवि-१४, दि.२८.१०.२०२१.
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२१/प्र.क्र.२०६/नवि-१४, दि.१०.०२.२०२२.
८. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२२/प्र.क्र.१०२/नवि-१४, दि.१४.११.२०२२.
९. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२२/प्र.क्र.३४३/नवि-१४, दि.०४.०५.२०२३.
१०. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२३/प्र.क्र.१२५/नवि-१४, दि.१२.०७.२०२३.
११. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२३/प्र.क्र.३८९/नवि-१४, दि.०८.०१.२०२४.
१२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२४/प्र.क्र. १०१/नवि-१४, दि.१५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील तालुका मुख्यालयांच्या ठिकाणी व अन्य ठिकाणी नव्याने स्थापन करण्यात आलेल्या १०१ नगरपरिषदा/ नगरपंचायतींचा व आकृतीबंध/ पदनिर्मितीचा व त्यासाठीच्या वार्षिक आवर्ती सहायक अनुदानाचा प्रस्ताव शासन निर्णय दि.०५.०७.२०१६ अन्वये मंजुर करण्यात आला आहे. तसेच, नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे भरण्यासाठी निकष विहीत केले आहेत.

त्याचप्रमाणे, दि.०५.०७.२०१६ च्या शासन निर्णयामध्ये परिच्छेद क्र.७ मध्ये, यापुढे, नव्याने निर्माण होणाऱ्या नगरपरिषदा/ नगरपंचायती यांच्याकरीता उपरोक्त निकषानुसार आकृतीबंध निश्चित करण्यास व अनुषंगाने पदे निर्माण करण्यास मंत्रीमंडळाने मान्यता दिली असून, आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त निकषानुसार यापुढे नव्याने निर्माण होणाऱ्या नगरपरिषदा/ नगरपंचायती यांच्याकरीताचा प्रस्ताव शासनास सादर करावा असे स्पष्ट करण्यात आले आहे.

महाराष्ट्र नगरपरिषद संवर्गातील पदांसाठी नगरपरिषद/ नगरपंचायतनिहाय प्रमाणनिश्चिती व सुधारित आकृतीबंध संदर्भीय क्र. ३ येथील दि.१२.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आला आहे.

तसेच, संदर्भ क्र.५ येथील दि.११.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार स्वच्छता निरीक्षक संवर्गाचा समावेश राज्यस्तरीय संवर्ग पदांमध्ये करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयानुसार महाराष्ट्र नगरपरिषद स्वच्छता निरीक्षक सेवा संवर्गाची पदसंख्या निश्चित करण्यात आलेली आहे.

उपरोक्त संदर्भ क्र.१, ३ व ५ येथील शासन निर्णयातील तरतूदींच्या अनुषंगाने, संदर्भीय क्र.२,४,७,८,९, १० व ११ येथील शासन निर्णयान्वये अनुक्रमे २७, ७, १२,४,१,१ व ३ अशा एकूण ५५ नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींसाठी व आकृतीबंध/ पदनिर्मिती व त्यासाठीचे वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

आता, उपरोक्त दि.०५.०७.२०१६, दि.१२.०२.२०१८ व दि.११.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अनुषंगाने, राज्यातील नवनिर्मित ०५ नगरपरिषद/नगरपंचायतींचा (निलडोह नगरपंचायत, कोंढाळी नगरपंचायत, बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत जि.नागपूर, डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर व हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला) आकृतीबंध निश्चित करणे व अनुषंगाने पदनिर्मिती करण्याबाबतचा व सदर पदांच्या वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूरीबाबतचा प्रस्ताव आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी शासनास सादर केला आहे.

प्रत्येक नगरपरिषद/ नगरपंचायती यांच्याकरीता अधिनियमातील तरतूदीनुसार मुख्याधिकारीचे १ पद निर्माण करणे आवश्यक आहे. तसेच, दि.१५.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील "क" वर्ग दर्जाच्या नगरपरिषदांमधील मुख्याधिकारी पदावर महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवेतील मुख्याधिकारी गट-अ/सहाय्यक आयुक्त गट-अ संवर्गातील अधिका-यांची नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने, ०२ नवनिर्मित नगरपरिषदा (डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर व हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला) या तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी अद्याप मंजूर नसल्याने मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील S-२० या वेतनश्रेणीतील ०२ पदे निर्माण करणे आवश्यक आहे. तसेच ०३ नवनिर्मित नगरपंचायती (निलडोह नगरपंचायत, कोंढाळी नगरपंचायत व बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत, जि.नागपूर,)या तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी अद्याप मंजूर नसल्याने त्यानुषंगाने ३ नगरपंचायतींकरीता मुख्याधिकारी गट-ब या संवर्गातील S-१५ या वेतनश्रेणीतील ३ पदे निर्माण करणे तसेच, सदर नवनिर्मित ०५ नगरपरिषद/नगरपंचायतीसाठी दि.०५.०७.२०१६, दि.१२.०२.२०१८ व दि.११.०९.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आवश्यक आकृतीबंध निश्चिती व वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूरी तसेच, सफाई कामगारांच्या पदांसाठी वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

नगर विकास विभागाच्या दि.०५.०७.२०१६, दि.१२.०२.२०१८ व दि.११.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार खाली नमूद एकुण ०५ नगरपरिषद/नगरपंचायतीसाठी लोकसंख्येच्या प्रमाणानुसार एकुण १५५ पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात येत असून, त्यासाठीचा रु.७,४३,१३,३३४/- वार्षिक आवर्ती खर्च पुढीलप्रमाणे आहे.

| **लोकसंख्या** | **नगरपंचायतींचे नाव** | **एकुण प्रस्तावित पदांची संख्या** | **एकुण वार्षिक आवर्ती सहायक अनुदान रू.** |
|---|---|---|---|
| २०,८८८ | निलडोह नगरपंचायत, जि.नागपूर | २८ | १,३०,५७,६३७/- |
| १३,८१७ | कोंढाळी नगरपंचायत, जि.नागपूर | २८ | १,३०,५७,६३७/- |
| ६,२२३ | बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा न.पं., जि.नागपूर | २८ | १,३०,५७,६३७/- |
| २३,२१६ | हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला | २८ | १,३७,५६,८०५/- |
| ३९,९९९ | डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर | ४३ | २,१३,८३,६१८/- |
| **एकुण** | | **१५५** | **७,४३,१३,३३४/-** |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद दि.०५.०७.२०१६, दि.१२.०२.२०१८ व दि.११.०९.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार लोकसंख्यानिहाय नवनिर्मित एकुण ०५ नगरपरिषदा/नगरपंचायतीसाठी (निलडोह नगरपंचायत, कोंढाळी नगरपंचायत, बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत जि.नागपूर, डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर व हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला) सोबतच्या **सहपत्र-अ व ब** मधील १५५ पदांच्या आकृतीबंधास व त्यासाठीच्या वार्षिक आवर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार, **एकुण रु.७,४३,१३,३३४/-** एवढे वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

३. तसेच, निलडोह नगरपंचायत, कोंढाळी नगरपंचायत, बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत जि.नागपूर, व हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला या ०४ नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींची लोकसंख्या २५,००० पेक्षा कमी असून, दर १००० लोकसंख्येमागे १ सफाई कामगाराचे पद निर्माण करणे आवश्यक आहे. यास्तव, सदर लोकसंख्येनुसार ६२ सफाई कामगारांच्या काल्पनिक पदांच्या वेतनापोटी रु.१,७६,७५,९५२/- इतके वार्षिक आवर्ती सहायक अनुदान अनुज्ञेय होईल. तथापि, प्रथम टप्प्यात ६२ काल्पनिक पदांऐवजी ३२ एवढ्या सफाई कामगारांच्या काल्पनिक पदांच्या वेतनाएवढे म्हणजेच **रु.८८,३७,९७६/-** एवढे वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे. तसेच, डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर या नवनिर्मित नगरपरिषदेची लोकसंख्या २५,००० पेक्षा जास्त असून, दर १००० लोकसंख्येमागे १ सफाई कामगाराचे पद निर्माण करणे आवश्यक आहे. यास्तव, सदर लोकसंख्येनुसार ३८ सफाई कामगारांच्या काल्पनिक पदांच्या वेतनापोटी रु.१,०८,३३,६४८/- इतके वार्षिक आवर्ती सहायक अनुदान अनुज्ञेय होईल. तथापि, प्रथम टप्प्यात ३८ काल्पनिक पदांऐवजी १९ एवढ्या सफाई कामगारांच्या काल्पनिक पदांच्या वेतनाएवढे म्हणजेच **रु.५४,१६,८२४/-** एवढे वार्षिक आवर्ती सहायक अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

४. तसेच, डिगडोह नगरपरिषद, जि.नागपूर व हिवरखेड नगरपरिषद, जि.अकोला या ०२ नवनिर्मित नगरपरिषदांसाठी मुख्याधिकारी गट-अ संवर्गातील S-२० या वेतनश्रेणीतील ०२ पदे व नागपूर जिल्ह्यातील निलडोह नगरपंचायत, कोंढाळी नगरपंचायत, बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत या ०३ नवनिर्मित नगरपंचायतींकरिता मुख्याधिकारी गट-ब या संवर्गातील S-१५ या वेतनश्रेणीतील ०३ पदे निर्माण करण्यात येत आहेत.

५. उपरोक्तप्रमाणे, निर्माण करण्यात आलेली पदे दि.०५.०७.२०१६ च्या शासन निर्णयातील विहित कार्यपद्धती अवलंबून भरण्याबाबतची कार्यवाही करुन, त्याबाबतच्या करण्यात येत असलेल्या कार्यवाहीचा अहवाल यासंदर्भात दि.०५.०७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या समितीकडून दर पंधरवड्यास शासनास सादर करावा.

६. उपरोक्त पदावरील खर्च मागणी क्र.मुख्य लेखाशीर्ष एफ-२, “१९२, नगरपरिषदांना सहाय्य” (००)(६०) जकात कर व महागाई भत्ता रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना सहायक अनुदान (२२१७८०६६) या खाली टाकून सन २०२४-२०२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२६११४७२५२६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A08E157E090DE76FD7473747C56539E08109C40C5E2E8FE638A0A32B6B0BE227, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2024.08.26 12:01:52 +05'30'

**सोबत:-सहपत्र- अ व ब.**

**(अ.का.लक्कस)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
४. मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ यांचे खाजगी सचिव.
५. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य.
६. मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय.
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
९. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी.
१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
११. सर्व संबंधित विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक.
१२. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
१३. सर्व संबंधित नगरपरिषदा/नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी.
१४. वित्त विभाग (कार्या.वित्तिय सुधारणा-१/व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
१५. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. महालेखापाल (ले. प अ.)/(ले.प.), १ व २, मुंबई/ नागपूर.
१८. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
१९. निवडनस्ती (नवि-१४)

नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ -२०२४/ प्र.क्र.२२७/ नवि-१४, दि २२ ऑगस्ट २०२४ सोबतचे

**सहपत्र-अ**

**१०,००१ ते २५००० लोकसंख्या असलेल्या ०४ नगरपंचायतींकरीता मंजूर करावयाच्या पदांचा तपशील.**

**(अ) राज्यस्तरीय संवर्गातील पदांव्यतिरिक्त पदे.**

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतन श्रेणी | पदसंख्या (१ न.पं.) | पदसंख्या (४ न.पं.) | वार्षिक खर्च (१ न.पं.) | वार्षिक खर्च (४ न.पं.) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | लिपिक टंकलेखक | S-६(₹१९९००-६३२००) | ७ | २८ | २,१९,४४४ | ८,७७,७७६ |
| २. | गाळणी चालक/ प्रयोगशाळा सहायक | S-७(₹२१७००-६९१००) | १ | ४ | ३४,१३८ | १,३६,५५२ |
| ३. | पंप ऑपरेटर/ विजतंत्री/ जोडारी | S-६(₹१९९००-६३२००) | ३ | १२ | ९४,०४७ | ३,७६,१८८ |
| ४. | तारतंत्री/ वायरमन | S-१(₹१५०००-४७६००) | १ | ४ | ३१,३४९ | १,२५,३९६ |
| ५. | शिपाई | S-१(₹१५०००-४७६००) | ३ | १२ | ७१,२७४ | २,८५,०९६ |
| ६. | मुकादम | S-३(₹१६६००-५२४००) | २ | ८ | ५२,४७४ | २,०९,८९६ |
| ७. | व्हाल्वमन | S-१(₹१५०००-४७६००) | १ | ४ | २३,७५८ | ९५,०३२ |
| | | **एकुण** | **१८** | **७२** | **५,२६,४८४** | **२१,०५,९३६** |

**१०००१ ते २४,९९९ लोकसंख्या असलेल्या नव्याने स्थापन नगरपंचायतीसाठी महाराष्ट्र नगरपरिषद संवर्ग सेवांतर्गत पदांचा सुधारित आकृतीबंध.**

| **महाराष्ट्र नगरपरिषद राज्यस्तरीय संवर्ग सेवा नगरपरिषद व नगरपंचायत निहाय प्रस्तावित पदसंख्या** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| आकृतीबंध प्रकार क्र. | ७ | १०००१ ते २४,९९९ पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या नव्याने स्थापन नगरपंचायतीसाठी | | | | |
| नगरपरिषद/ नगरपंचायती संख्या | ४ | नगरपरिषद/ नगरपंचायत निहाय पदसंख्या | | | | ४ |
| संवर्ग सेवा नाव | | श्रेणी-अ | श्रेणी-ब | श्रेणी-क | श्रेणी-क | सेवा निहाय एकुण पद संख्या |
| | | S-१५ (₹४१८००-१३२००) | S-१४ (₹३८६००-१२२८००) | S-१३ (₹३५४००-११२४००) | S-१० (₹२९२००-९२३००) | |
| महाराष्ट्र नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा | अ.स्थापत्य | ० | १ | ० | ० | १ |
| | ब.विद्युत | ० | ० | ० | ० | ० |
| | क.संगणक | ० | ० | ० | ० | ० |
| महाराष्ट्र नगरपरिषद जलदाय, मलनिस्सारण व स्वच्छता अभियांत्रिकी सेवा | | ० | ० | १ | ० | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद लेखापाल व लेखापरिक्षक | | ० | ० | २ | ० | २ |
| महाराष्ट्र नगरपरिषद कर निर्धारक व प्रशासकीय सेवा | | ० | २ | ० | १ | ३ |
| महाराष्ट्र नगरपरिषद अग्निशमन सेवा | | ० | ० | ० | ० | ० |
| महाराष्ट्र नगरपरिषद नगररचनाकार आणि विकास सेवा | | ० | ० | १ | ० | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद स्वच्छता निरीक्षक सेवा | | ० | ० | ० | १ | १ |
| **श्रेणी निहाय एकुण पदसंख्या** | | **०** | **३** | **४** | **२** | **९** |

**१०००० ते २४,९९९ लोकसंख्या असलेल्या नगरपंचायतींची यादी**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | नगरपंचायत/नगरपरिषद |
|---|---|---|---|
| १. | नागपूर | नागपूर | निलडोह नगरपंचायत |
| २. | | | कोंढाळी नगरपंचायत |
| ३. | | | बिडगाव-तरोडी (खुर्द) पांढुर्णा नगरपंचायत |
| ४. | अमरावती | अकोला | हिवरखेड नगरपरिषद |

नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ -२०२४/ प्र.क्र. २२७ / नवि-१४, दि.२२ ऑगस्ट,२०२४ सोबतचे

**सहपत्र-ब**

**२५००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ०१ नगरपरिषदांकरीता मंजूर करावयाच्या पदांचा तपशील.**

**(अ) राज्यस्तरीय संवर्गातील पदांव्यतिरिक्त पदे**

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतन श्रेणी | पदसंख्या (१ न.पं.) | वार्षिक खर्च (१ न.पं.) |
|---|---|---|---|---|
| १. | लिपिक टंकलेखक | S-६(₹१९९००-६३२००) | १० | ३७,६१,८९० |
| २. | गाळणी चालक/ प्रयोगशाळा सहायक | S-७(₹२१७००-६९१००) | १ | ४,०९,६५२ |
| ३. | पंप ऑपरेटर/ विजतंत्री/ जोडारी | S-६(₹१९९००-६३२००) | ३ | ११,२८,५६७ |
| ४. | तारतंत्री/ वायरमन | S-१(₹१५०००-४७६००) | ३ | ११,२८,५६७ |
| ५. | शिपाई | S-१(₹१५०००-४७६००) | ३ | ८,५५,२८८ |
| ६. | मुकादम | S-३(₹१६६००-५२४००) | ४ | १२,५९,३६४ |
| ७. | व्हॉलमन | S-१(₹१५०००-४७६००) | १ | २,८५,०९६ |
| **एकुण** | | | **२५** | **८८,२८,४२४** |

**२५००० ते ३९,९९९ लोकसंख्या असलेल्या "क" वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायतींसाठी महाराष्ट्र नगरपरिषद संवर्ग सेवांतर्गत पदांचा सुधारीत आकृतीबंध.**

| **महाराष्ट्र नगरपरिषद राज्यस्तरीय संवर्ग सेवा नगरपरिषद व नगरपंचायत निहाय प्रस्तावित पदसंख्या** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| आकृतीबंध प्रकार क्र. | ५ | २५००० ते ३९,९९९ लोकसंख्या असलेल्या "क" वर्ग नगरपरिषदासाठी | | | | |
| नगरपरिषद/ नगरपंचायती संख्या | १ | नगरपरिषद/ नगरपंचायती निहाय पदसंख्या | | | | १ |
| संवर्ग सेवा नाव | | श्रेणी-अ S-१५ (₹४१८००-१३२००) | श्रेणी-ब S-१४ (₹३८६००-१२२८००) | श्रेणी-क S-१३ (₹३५४००-११२४००) | श्रेणी-क S-१० (₹२९२००-९२३००) | सेवा निहाय एकुण पद संख्या |
| महाराष्ट्र नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा | अ.स्थापत्य | ० | १ | १ | ० | २ |
| | ब.विद्युत | ० | ० | १ | ० | १ |
| | क.संगणक | ० | ० | १ | ० | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद जलदाय, मलनिस्सारण व स्वच्छता अभियांत्रिकी सेवा | | ० | ० | १ | ० | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद लेखापाल व लेखापरिक्षक | | ० | ० | २ | ० | २ |
| महाराष्ट्र नगरपरिषद कर निर्धारक व प्रशासकीय सेवा | | ० | २ | ० | ४ | ६ |
| महाराष्ट्र नगरपरिषद अग्निशमन सेवा | | ० | ० | ० | १ | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद नगररचनाकार आणि विकास सेवा | | ० | ० | १ | ० | १ |
| महाराष्ट्र नगरपरिषद स्वच्छता निरीक्षक सेवा | | ० | ० | ० | २ | २ |
| **श्रेणी निहाय एकुण पदसंख्या** | | **०** | **३** | **७** | **७** | **१७** |

**२५००० ते ३९९९९पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या नगरपंचायतींची यादी.**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | नगरपरिषद |
|---|---|---|---|
| १. | नागपूर | नागपूर | डिगडोह नगरपरिषद |